श्री. अनंता लक्ष्मण निनावे, वरिष्ठ पणन अधिकारी यांच्या घरबांधणी अग्रीमावरील व्याज क्षमापित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक - सपववि-३७०१२/१३/२०२२-DESKTEX-२**
१६ वा मजला, नवीन प्रशासन इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०६ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.एचबीए/१०७६/सीआर/७६५-जीईएन-५ दि.०५ फेब्रुवारी,१९८१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.घबांअ-२०१९/प्र.क्र.१४/२०१९/विनियम दि.०२ फेब्रुवारी,२०२१
३) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर पत्र क्र.कार्या७(४) /लेखा/ घ.बा.अ.व्या.क्ष. (अलनिनावे)/ ७४३ /२३ दि. ०८फेब्रुवारी,२०२२
४) वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर पत्र क्र.कार्या७(४)/लेखा/घ.बा.अ.व्या.क्ष.(अलनिनावे)/ ९९१/२३ दि. २१ फेब्रुवारी,२०२३

**शासन ज्ञापन :-**

उपरोक्त संदर्भाधीन पत्र क्र. ४ च्या अनुषंगाने आपणास असे कळविण्यात येते की, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर येथे कार्यरत असणाऱ्या दिवंगत श्री. अनंता लक्ष्मण निनावे, वरिष्ठ पणन अधिकारी यांचे दि.२९ मे, २०२१ रोजी निधन झाले आहे. त्यांना वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांच्या पत्र क्र. कार्या७(४)/लेखा/घबां अग्रीम/१०७३/२०१० दि.११ फेब्रुवारी, २०१० अन्वये वित्तीय नियमावली १९५९ मधील नियम क्र-१३४ नुसार आर्थिक वर्ष सन २००९-१० मध्ये रु.१२,००,०००/- (रु. बारा लाख फक्त) घरबांधणी अग्रीम प्रदान करण्यात आलेला होता. सदर घरबांधणी अग्रीमाची माहे मार्च २०१० ते फेब्रुवारी २०२१ या कालावधीत त्यांचे मासिक वेतनातून मुद्दल रक्कमेची संपूर्ण परतफेड करण्यात आली आहे. वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे आदेश क्र.कार्या७(४)लेखा/घबांअ व्याज/१८५१/२०२१ दि.०५ एप्रिल, २०२१ अन्वये त्यांच्या घरबांधणी अग्रीमावरील व्याज रु.६,२५,०८४/- इतके आकारण्यात आले आहे. सदर व्याज त्यांच्या मासिक वेतनातून ४८ मासिक हप्त्यात वसूल करण्यात येणार होते. वस्त्रोद्योग आयुक्तालयाने त्यांच्या माहे मार्च, एप्रिल व मे २०२१ च्या मासिक वेतनातून रु.३९,१८४/- इतक्या व्याजाची वसूली केली. उर्वरित रु.५,८५,९००/- इतके व्याजाची वसूल होण्यापूर्वीच श्री. अनंता लक्ष्मण निनावे, वरिष्ठ पणन अधिकारी यांचे दि. २९ मे, २०२१ रोजी निधन झाले. त्यामुळे त्यांच्याकडून घरबांधणी अग्रीमावरील व्याज रु. ५,८५,९००/- (रु. पाच लक्ष पंच्याऐंशी हजार नऊशे फक्त) वसूल करता आलेले नाही. सदर रक्कम क्षमापित करण्याचा प्रस्ताव संदर्भ क. ३ व ४ नुसार वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुसार सदर घरबांधणी अग्रिमावरील व्याजाची रक्कम क्षमापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. दिवंगत श्री. निनावे यांची नियुक्ती अनुसूचित जमाती या प्रवर्गातून करण्यात आली होती. तथापि, मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार त्यांना खुल्या प्रवर्गात सामावून घेण्यात आले होते.

तथापि, सामान्य प्रशासन विभागाने सदर प्रकरणी दिलेल्या अभिप्रायाच्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाचा दि.२१ डिसेंबर, २०१९ चा शासन निर्णयानुसार त्यांना वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे कार्यालयीन आदेश क्र.कार्या-०१/आस्था/अनु.जमाती/८३/२०२३ दि.०४ जानेवारी, २०२४ नुसार पुर्वलक्षी प्रभावाने अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आले आहे. दिवंगत श्री. निनावे यांना अधिसंख्य पदावर वर्ग केल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१४ डिसेंबर, २०२२ नुसार अधिसंख्य पदावरील कर्मचाऱ्यांना देण्यात येणारे सेवाविषयक लाभ त्यांना अनुज्ञेय आहेत.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. घबांअ-२०१९/प्र.क्र.१४/२०१९/विनियम दि.०२ फेब्रुवारी, २०२१ मधील परिच्छेद १० मधील तरतुदीनुसार दिवंगत श्री. अनंता लक्ष्मण निनावे, वरिष्ठ पणन अधिकारी यांचे निधन झाले असल्याने त्यांच्या घर बांधणी अग्रीमावरील रु. ५,८५,९००/- (रु. पाच लक्ष पंच्याऐंशी हजार नऊशे फक्त) इतके व्याज माफ करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. हे ज्ञापन माहराष्ट्र शासन वित्त विभाग, शासन निर्णय क्र.एचबीए/१०७६/सीआर/७६५-जीईएन-५ दि. ०५ फेब्रुवारी१९८१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येते आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.com या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०३०६१२१७२४६९०२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

GAURI RAHUL MHASKE

Digitally signed by GAURI RAHUL MHASKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILES DEPARTMENT, 2.5.4.20=9e5721a987027f2e238034188d086bb44a9aa24eeb5b83735e1bbb433b57d4ef, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B018BA858DD6B20CC7A84F6BC86A86D6A6E9AC3AC56C5DBFCD89F36C74DE3E1F, cn=GAURI RAHUL MHASKE
Date: 2024.03.06 12:26:27 +05'30'

**( गौरी रा. म्हस्के )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
४. उपसचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रादेशिक उपआयुक्त वस्त्रोद्योग,नागपूर
६. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
८. श्रीमती कल्पना अनंता निनावे, ३३ जयताळा शाळेजवळ, उमरेड रोड, बिसरा रोड, दिघोरी, नागपूर-०९ (मार्फत- प्रादेशिक उपआयुक्त वस्त्रोद्योग,नागपूर)
९. निवड नस्ती (कार्यासन-टेक्स-२).